नवीन १०० विद्यार्थी क्षमतेच्या १०० शासकीय मागासवर्गीय वसतीगृहातील तसेच विभागीय स्तरावरील १००० विद्यार्थी क्षमतेच्या ०७ वसतीगृहातील विद्यार्थ्यांच्या प्रवेशासाठी मागास प्रवर्गाचे सुधारीत आरक्षण निश्चित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१२/प्र.क्र.११६/शिक्षण-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० जुलै, २०१४

वाचा -

१) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्रमांक-बीसीएच- १०८२/९०३६५/ (३८)/ बीसीडब्ल्यू-४, दि. १६ मे, १९८४
२) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक-बीसीएच- १०९६/प्र.क्र. १४/ मावक-४, दि. १३ जून, १९९६
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-बीसीएच- २००३/प्र.क्र. ६५५/ मावक-४, दि. ६ जुलै, २००४
४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. खाबाप्र-२०१२/ प्र.क्र.११६/ शिक्षण-२, दिनांक १६ मे, २०१२.
५) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. बीसीएच-२०१२/ प्र.क्र.११६/ शिक्षण-२, दिनांक २२ जून, २०१२.
६) आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे पत्र क्रमांक-सकआ/शावगृहे/प्रवेश/सुधारित/ आरक्षण/का-५/५७६, दिनांक २९ एप्रिल,२०१२
७) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. बीसीएच-२०१२/ प्र.क्र.११६/ शिक्षण-२, दिनांक ११ जुलै, २०१२.
८) मा.उपमुख्यमंत्री यांच्याकडे दि.१८.०६.२०१४ रोजी झालेली बैठक.

प्रस्तावना -

सामाजिक न्याय विभागाच्या अधिपत्याखाली राज्यात जिल्हास्तरावर नव्याने १०० वसतीगृहे व विभागीय स्तरावर ७ वसतीगृहे सुरु करण्यात आलेली आहेत. सदर नवीन शासकीय वसतीगृहातील विद्यार्थ्यांच्या प्रवेशाबाबत संदर्भादीन क्र.७ च्या शासन निर्णयान्वये मागासवर्गीय प्रवर्गनिहाय आरक्षण ठेवण्यात आले आहे.सदर आरक्षणानुसार प्रवेश देण्यामध्ये आलेल्या अडी-अडचनी विचारात घेऊन त्यामध्ये बदल करुन सुधारीत आरक्षण ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**-

राज्यात माहे जून, २०११ पासून सुरु करण्यात आलेल्या १०० विद्यार्थी क्षमतेच्या १०० नवीन शासकीय वसतीगृहे तसेच विभागीय स्तरावरील १००० विद्यार्थी क्षमतेच्या ०७ वसतीगृहांमध्ये

प्रवेशासाठी खालीलप्रमाणे मागासवर्गीयांचे प्रवर्गनिहाय सुधारीत आरक्षण निश्चित करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | प्रवर्ग | आरक्षणाची टक्केवारी |
|---|---|---|
| १ | अनुसूचित जाती | ८० |
| २ | विमूक्त जाती व भटक्या जमाती | १० |
| ३ | इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग | १० |
| | एकूण | १०० |

वरील प्रवर्गनिहाय आरक्षणामध्ये त्या-त्या प्रवर्गातील अपंग विद्यार्थ्यांसाठी ३ टक्के समांतर आरक्षण राहील.

२. वरील वसतीगृहामध्ये अभ्यासक्रमनिहाय प्रवेशासाठीची टक्केवारी खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र | अभ्यासक्रम | विभागीय स्तरावरील वसतीगृहांसाठी प्रवेशाची टक्केवारी | जिल्हास्तरावरील वसतीगृहांसाठी प्रवेशाची टक्केवारी | तालुकास्तरावरील वसतीगृहांसाठी प्रवेशाची टक्केवारी |
|---|---|---|---|---|
| १ | कनिष्ठ महाविद्यालय | १५ टक्के | २० टक्के | २० टक्के |
| २ | व्यावसायिक महाविद्यालय | ७० टक्के | २५ टक्के | २० टक्के |
| ३ | बिगर व्यावसायिक वरिष्ठ महाविद्यालय | १५ टक्के | २५ टक्के | २० टक्के |
| ४ | विद्यालय विभाग | ० टक्के | ३० टक्के | ४० टक्के |
| | **एकुण** | **१०० टक्के** | **१०० टक्के** | **१०० टक्के** |

३. अनुसूचित जातीसाठी राखून ठेवलेल्या जागांपैकी महापालिका क्षेत्रात व अ-वर्ग नगरपालिका क्षेत्रात १४ टक्के जागा मांग व मेहत्तर जातीसाठी (मांग जातीसाठी ७ टक्के व मेहत्तर जातीसाठी ७ टक्के) आणि जिल्हा व तालुका पातळीवर मांग व मेहत्तर जातीसाठी १० टक्के जागा (मांग जातीसाठी ५ टक्के व मेहत्तर जातीसाठी ५ टक्के) राखीव ठेवण्यात याव्यात.

४. वरील प्रमाणे शासकीय वसतीगृहातील प्रवेशाकरीता अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रु. २ लाख व विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रु.१ लाख अशी असेल. तथापी अपंग व अनाथ प्रवर्गातील विद्यार्थ्यांना उत्पन्नाची मर्यादा लागू राहणार नाही.

५. या आदेशाची अंमलबजावणी सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षापासून करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३०१७४९४५५१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Pandurang Wadte

Digitally signed by Kiran Pandurang Wadte
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kiran Pandurang Wadte
Date: 2014.08.01 16:46:16 +05'30'

**कि.पां.वडते**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. संचालक, विजाभज, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग
५. सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण
६. सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
७. मा.मंत्री /राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
८. विभागातील सर्व कार्यासने
९. निवड नस्ती (शिक्षण-२)